**भारत सरकार, गृह मंत्रालय, यांच्याकडून *"Special Infrastructure Scheme (SIS), including construction of 250 fortified Police Stations in LWE affected States"* या योजनेखाली प्राप्त झालेला रु.३ कोटी इतका अग्रीम वितरित करणे व खर्च करणे यांकरिता मंजूरी देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांक पीडब्लूएफ-०११८/प्र.क्र.५८/पोल-७.
मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २३ ऑगस्ट २०१८.

वाचा :-
१) भारत सरकार, गृह मंत्रालय, एल. डब्ल्यु.ई. विभाग, पत्र क्र. १८०१५/ ०२/ २०१८-एल.डब्ल्यु.ई.-IV, दिनांक १५.०३.२०१८.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र. पीडब्लूएफ-०११८/प्र.क्र.५८/पोल-७, दिनांक ०५.०४.२०१८.
३) भारत सरकार, गृह मंत्रालय, एल.डब्ल्यु.ई. विभाग, पत्र क्र. १८०१५/ ०२/ २०१८-एल.डब्ल्यु.ई.-IV, दिनांक ०६.०७.२०१८.

**शासन निर्णय.-**

भारत सरकार, गृह मंत्रालय, यांनी *"Special Infrastructure Scheme (SIS), including construction of 250 fortified Police Stations in LWE affected States"* या योजनेखाली, दिनांक १५.०३.२०१८ रोजीच्या संदर्भाधीन पत्राव्दारे, महाराष्ट्र राज्याकरिता रु.३ कोटी *(रुपये तीन कोटी फक्त)* इतकी रक्कम *"ad hoc advance"* म्हणून सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरिता वितरित केली आहे. उक्त रक्कम महाराष्ट्र राज्याच्या एकत्रित निधीत दिनांक १६.०३.२०१८ रोजी जमा झाली. उक्त रु.३ कोटी *(रुपये तीन कोटी फक्त)* पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांना वितरित करण्यासाठी, याव्दारे, पुढील अटींवर, मंजूरी देण्यात येत आहे:-

१) उक्त निधी हा भारत सरकार, गृह मंत्रालय, यांच्या *"Project Clearance Committee (PCC)"* च्या दिनांक १३.०६.२०१८ रोजीच्या बैठकीत *"Special Infrastructure Scheme (SIS), including construction of 250 fortified Police Stations in LWE affected States"* या योजनेखाली मंजूर करण्यात आलेल्या प्रयोजनांसाठीच खर्च करण्यात यावा.

२) उक्त निधी *(केंद्र शासनाचा हिस्सा, ६० टक्के)* हा उक्त योजनेखाली राज्य शासनाचा हिस्सा (४० टक्के) उपलब्ध झाल्यावरच उपयोजित करावा.

२. उक्त खर्च हा, *गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१०, ४०५५, पोलीसांवरील भांडवली खर्च, (००) २०७, राज्य पोलीस (००), (००)(०३) नक्षलग्रस्त भागामध्ये सुसज्ज पोलीस स्टेशन बांधणे (६० टक्के केंद्र हिस्सा) (अनिवार्य) (४०५५०२०५), ५३ मोठी बांधकामे,* या लेखाशीर्षाखाली चालू (सन २०१८-१९) वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उक्त रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई, येथून काढून संबंधितांना प्रदान करण्याच्या प्रयोजनासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३६८/ अर्थोपाय, दिनांक २०.०७.२०१८, अन्वये वित्त विभागाशी विचारविनिमय करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०८२३१७०६५७१८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.08.23 17:11:05 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा. गृह राज्यमंत्री (शहरे/ ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई.

**प्रत:-**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
६) कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल, पोल-७.